**राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती-२ (SLTAC-II) च्या युनिटसाठी आकृतीबंध निश्चित करुन पदे उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१७/प्र.क्र.९४/२०१७/आ.(प्रशि)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- ८ मे, २०१७.

**वाचा :**

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि. ८/३/१९८४.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२.
३) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक: सीओई/२०१३/(२३/२०१३)/ज.वि., दि.६/२/२००३.
४) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक: संकीर्ण-२०१५/११९/२०१५/जसं(आस्था), दि.१६/१२/२०१५
५) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक: WRD-Restructuring-2016/305/104/16/WR(Estt), Dt.4/8/2016
६) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक: आढावा-२०१६/प्र.क्र.२१८/२०१६/आ(प्रशि), दि.८/११/२०१६

**प्रस्तावना** -

दिनांक १४/१/२०१५ च्या शासन निर्णयान्वये जलसंपदा प्रकल्पांच्या प्रशासकीय मान्यता व सुधारीत प्रशासकीय मान्यताच्या प्रस्तावांची छानन्नी करण्यासाठी राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती-१ (SLTAC-I) ची स्थापना करण्यात आलेली आहे. समितीच्या कामाचा व्याप व महत्व विचारात घेता समितीचे सबलीकरण करण्याच्या दृष्टीकोनातून संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये सदर समितीस एकूण ४२ पदे उपलब्ध करुन कार्यालयाची रचना करण्यात आली आहे. तसेच, संदर्भ क्र.५ च्या शासन निर्णयान्वये विदर्भ व मराठवाडा व्यतिरिक्त उर्वरित महाराष्ट्र प्रदेशातील प्रशासकीय मान्यता / सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्तावांची सखोल तपासणी करण्यासाठी महासंचालक, वाल्मी, औरंगाबाद यांचे अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती-२ (SLTAC-II) ची स्थापना करण्यात आलेली असून त्यांतर्गत प्रस्तावांची छाननी करुन छाननी अहवाल तयार करण्याचे काम कोयना संकल्पचित्र मंडळाच्या अधीक्षक अभियंता यांना सदस्य सचिव या नात्याने सोपविण्यात आलेले आहे. परंतु यासाठी स्वतंत्र आस्थापना उपलब्ध होणार नाही व उपलब्ध आस्थापनेकडून ते काम करुन घ्यावे असे शासन निर्णयात नमूद करण्यात आले आहे.

सचिव (लाक्षेवि) यांनी SLTAC-II च्या कामाच्या अनुषंगाने आढावा घेतला असून कार्यालयांतर्गतच्या कामाची व्याप्ती लक्षात घेता SLTAC-II च्या कामासाठी किमान आवश्यक आस्थापना उपलब्ध करण्याबाबत दिलेल्या सुचनेनुसार ७ अधिकारी / कर्मचाऱ्यांचे एक अतिरिक्त युनिट निर्माण करुन ते कोयना संकल्पचित्र मंडळास संलग्न करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती-२ (SLTAC-II) च्या कामासाठी एक अतिरिक्त युनिट निर्माण करुन सदर युनिट अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे या मंडळ कार्यालयाच्या अधिनस्त **राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती, कक्ष-२ (SLTAC-II)** या नावाने कार्यान्वित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. युनिटची रचना खाली दर्शविल्यानुसार राहील.

| | | |
|---|---|---|
| कार्यकारी अभियंता | - | १ पद |
| सहायक अभियंता श्रेणी-१ | - | ४ पदे |
| कनिष्ठ लिपिक | - | १ पद |
| शिपाई | - | १ पद |
| एकूण | - | ७ पदे |

२. सदर कक्ष-२ या युनिट कार्यालयाकरिता आवश्यक असलेली आस्थापना संदर्भ क्र.६ च्या शासन निर्णयानुसार बंद करण्यात आलेल्या उपविभागीय कार्यालयातील मंजूर पदांमधून खालीलप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | आकृतीबंधानुसार मंजूर करण्यात आलेली पदे | वर्गीकरणाद्वारे पद उपलब्ध करुन द्यावयाच्या | |
|---|---|---|---|---|
| | | | कार्यालयाचे नांव (शासन निर्णय दिनांक ८/११/२०१६ नुसार बंद करण्यात आलेली कार्यालये) | पदसंख्या |
| १ | कार्यकारी अभियंता | १ | | --- |
| २ | सहायक अभियंता श्रेणी-१ | ४ | मध्यम प्रकल्प उपविभाग क्र.६, शिराळा | १ |
| | | | दुधगंगा डावा कालवा उपविभाग क्र.१, दुधगंगानगर | १ |
| | | | दुधगंगा डावा कालवा उपविभाग क्र.५, इस्पुर्ली | १ |
| ३ | कनिष्ठ लिपिक | १ | मध्यम प्रकल्प उपविभाग क्र.६, शिराळा | १ |
| ४ | शिपाई | १ | मध्यम प्रकल्प उपविभाग क्र.६, शिराळा | १ |
| | एकूण :- | **७** | | **५** |

तथापि, सदर युनिटसाठी स्तंभ-५ नुसार उपलब्ध करण्यात आलेली पदे वगळून कार्यकारी अभियंताचे १ पद व सहायक अभियंता श्रेणी-१ चे १ पद यथावकाश उपलब्ध करण्यात येईल.

३. उपरोक्त युनिट कार्यालयास खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) परि.२ मध्ये नमूद केल्याप्रमाणे बंद करण्यात आलेल्या उप विभागीय कार्यालयातील मंजूर पदे रा.तां.स.कक्ष-२ या युनिटसाठी वर्ग करण्यात यावी. आवश्यक असलेली पदे परि.२ मधील तक्त्यात नमूद पदांमधूनच वापरण्यात यावीत. सद्य:स्थितीत कोणतीही नवीन पदे निर्माण करण्यात येणार नाहीत.

आ) युनिट कार्यालय शासकीय जागेतच कार्यान्वित करण्श्यात यावे, त्यासाठी बांधकामाचा वेगळ्याने खर्च करु नये. तसेच मंडळ कार्यालयातील उपलब्ध साहित्याचाच वापर

करण्यात यावा. प्रशासकीय, आस्थापना खर्चात वाढ होणार नाही याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक ईआरडब्ल्यू -१०८३/ सीआर-६११/ ८३/ एडीएम-९, दिनांक ८ मार्च १९८४ मधील तरतूदीनुसार, अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे या मंडळ कर्यालयाच्या अधीक्षक अभियंता यांना रा.तां.स.कक्ष-२ या युनिट कार्यालयाचे आहरण व संवितरण अधिकारी व नियंत्रण अधिकारी म्हणून यान्वये घोषित करण्यात येत आहे.

५. यासाठी होणारा खर्च मुख्य लेखाशीर्ष - "४८०१-वीज प्रकल्पावरील भांडवली खर्च, ०१ जलविद्युत निर्मिती ००१ संचालन व प्रशासन, (०१) संचालन व प्रशासन, (०१) (१२) अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे (४८०१ २४१२)" या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. उपरोक्त नमूद केलेले कार्यालय अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे या मंडळ कार्यालयांतर्गत दिनांक १ जून, २०१७ पासून कार्यान्वित होतील या दृष्टीने मंडळ कार्यालयाने आवश्यक ती सर्व कार्यवाही करावी.

७. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.१०९२/ सीआर/ ८०६/ व्यय-६, दिनांक १५-१०-१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने हा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in. या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१७०५०९१०४८५९१५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.05.09 10:49:58 +05'30'

**( वि. का. चौधरी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
४) मा.मंत्री (खारभूमी) यांचे खाजगी सचिव
५) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक

६) मा.विधानसभा/विधान परिषद सदस्य (सर्व)
७) प्रधान सचिव (ज.सं.प्र.व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
८) सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
११) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर
१२) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१३) सर्व कार्यकारी संचालक, महामंडळे / सर्व महासंचालक
१४) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
१६) अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे
१७) अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर
१८) अधीक्षक अभियंता, ई-प्रशासन मंडळ, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई (कार्यालयांच्या स्थलांतरणाबाबत आवश्यक ती नोंद घेण्यास्तव)
१९) कार्यकारी अभियंता, वारणा कालवे विभाग क्र.१, इस्लामपूर
२०) कार्यकारी अभियंता, दुधगंगा कालवे विभाग क्र.१, कोल्हापूर, इस्लामपूर
२१) सर्व अधिकारी व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२२) कार्यासन आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ .